**रमाई आवास घरकुल (ग्रामीण) योजनेच्या लाभार्थ्यांची निवड करण्याकरीता स्थापन करण्यात आलेली समिती पुनर्गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रआयो -२०१८/प्र.क्र.१३७/बांधकामे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १३ फेब्रुवारी, २०१९.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२००८/प्र.क्र.३६/ मावक-२, दि.१५/११/२००८.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२००९/प्र.क्र.१५९/ मावक-२, दि.९/३/२०१०.
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२००८/प्र.क्र.६/ मावक-३६, दि.२/१२/२०१०.
४) शासन ज्ञापन, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.रआयो-२०१४/प्र.क्र.१०/ बांधकामे, दि.१८/७/२०१४.
५) शासन निर्णय, ग्रामविकास विभाग क्र.ईआयो-२०१५/प्र.क्र.४१३/योजना-१०, दि.१०/२/२०१६
६) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.रआयो-२०१६/प्र.क्र.५७८/ बांधकामे, दि.३०/९/२०१६.

प्रस्तावना :-

राज्यातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील लोकांचे राहणीमान उंचावणे व त्यांच्या निवाऱ्याचा प्रश्न सुटावा म्हणून ग्रामीण व शहरी भागामध्ये त्यांच्या स्वत:च्या जागेवर अथवा कच्या घराच्या ठिकाणी पक्के घर बांधून देण्यासाठी शासनाने अनुसूचित जाती व नवबौध्द घटकासाठी घरकुल योजना संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये सुरु केली आहे. संदर्भ क्र.२ येथील दि.९/३/२०१० च्या शासन निर्णयान्व्ये सदर योजनेची अंमलबजावणी सुरू करण्यात आली आहे. राज्यात राबविण्यात येणाऱ्या इंदिरा आवास योजना या केंद्र पुरस्कृत योजनेसह सामाजिक न्याय विभागाची रमाई आवास योजनेची प्रभावी अंमलबजावणी व सनियंत्रण होण्यासाठी ग्रामविकास विभागाने रमाई आवास घरकुल (ग्रामीण) साठी संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माणची निर्मिती केली आहे.

केंद्र शासनाच्या दि.१३/४/२०१६ च्या मार्गदर्शक सूचनांनुसार इंदिरा आवास योजनेच्या नावात बदल करून प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण (PMAY-G) लागू करण्यात आली आहे. या योजनेमध्ये लाभार्थी निवड सामाजिक, आर्थिक व जात सर्वेक्षण २०११ (SECC-२०११) प्राधान्य क्रम यादी (Generated Priority List) मधून करण्याबाबतच्या सूचना देण्यात आल्या आहेत. सदर योजनेंतर्गत सन २०१९ पर्यंत ग्रामीण भागातील व सन २०२२ पर्यंत नागरी भागातील प्रत्येकाला

पक्के घर देण्याचे लक्ष्य निर्धारीत केले आहे. सदर योजनेंतर्गत लाभार्थी निवड SECC डाटामधून केली जाणार आहे. राज्यातील सर्व मागासवर्गीयांना सन २०१९ पर्यंत स्वत:चे पक्के घर उपलब्ध करून देण्याचे शासनाने जाहीर केले आहे. तद्नुषंगाने, प्रधानमंत्री आवास योजनेच्या मार्गदर्शक सुचनांनुसार रमाई आवास घरकुल योजना संपूर्णपणे सुधारीत करण्याच्या प्रस्तावावर स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येत आहे. सद्यस्थितीत प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत च्या लाभार्थी निवडीबाबतच्या मार्गदर्शक सूचना/निकष विचारात घेऊन त्या अनुषंगाने रमाई आवास घरकुल योजनेसाठी करावयाच्या घरकुल निर्माण समितीची पुर्नरचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

ग्रामीण क्षेत्रात निवड केलेल्या अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांची अंतिमत: निवड करण्याकरीता पुढीलप्रमाणे घरकुल निर्माण समिती पुनर्गठीत करण्यात येत आहे.

| क्षेत्र | घरकुल निर्माण समिती | पद |
|---|---|---|
| **ग्रामीण** | पालकमंत्री (संबंधित जिल्हाचे) | अध्यक्ष |
| | विधान सभा सदस्य संबंधित जिल्हा (अनुसूचित जातीचे) (**) | सदस्य |
| | मुख्य अधिकारी अधिकारी, जिल्हा परिषद, संबंधित जिल्हा | सदस्य |
| | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | सदस्य |
| | कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद (सार्वजनिक बांधकाम विभाग) | सदस्य |
| | सहायक आयुक्त, समाजकल्याण विभाग | सदस्य सचिव |

(**) ज्या जिल्ह्यात अनुसूचित जातीचे विधानसभा सदस्य नसतील, त्या जिल्ह्यात मा.मंत्री (सा.न्या. व वि.स.) महोदयांनी नामनिर्देशित केलेले विधानपरिषद सदस्य यांचा समावेश घरकुल निर्माण समितीमध्ये करण्यात यावा.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१९०२१४१२५४३९०६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a4735679 8e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2019.02.14 14:58:23 +05'30'

**(अनिल कों. आहिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
४) मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
६) मा.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
७) महालेखापाल,महाराष्ट्र,१,मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
९) सर्व विभागीय आयुक्त,
१०) सर्व जिल्हाधिकारी
११) सर्व महानगर पालिका आयुक्त
१२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
१३) आयुक्त, समाजकल्याण, पुणे.
१४) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण, सिडको भवन (दक्षिण कक्ष) सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई.
१५) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
१६) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण विभाग
१७) सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
१८) सर्व मुख्याधिकारी नगरपालिका/नगरपरिषद
१९) संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य,पुणे
२०) सर्व समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
२१) निवडनस्ती (बांधकामे).